बंदी क्र. १०१ [स्थानबध्द] भवन उर्फ मोहन पांडुरंग कोळी यांचे हार्ट ब्लॉक झाल्याने तात्काळ पेसमेकर बसविण्यासाठी येणा-या रु. ५०,०००/- एवढ्या खर्चास मंजुरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१९८/१[४१]/पीआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३ ऑगस्ट १९९८.

पहा:- कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-एमटीपी/भुपांको/१०१/१९९८/कक्ष-५[६] पुणे-१, दिनांक २०.७.९८.

शासन निर्णय:- नाशिक रोड मध्यवर्ती कारागृहातील बंदी क्र. १०१ [स्थानबध्द] भवन उर्फ मोहन पांडुरंग कोळी यांचे हार्ट ब्लॉक झाल्याने जे.जे. समूह रुग्णालय, मुंबई येथे त्यांना दाखल केलेले असून त्यांना पेसमेकर बसविण्यासाठी येणा-या रु. ५०,०००/- [रुपये पन्नास हजार फक्त] एवढ्या खर्चास शासन मंजुरी देत आहे.

२. हा खर्च "२०५६-तुरुंग[योजनेतर] १०१-तुरुंग-१०१[१] मध्यवर्ती कारागृह-इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन १९९८-९९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. यूओआर-४७७/९८/व्यय-८, दिनांक २८ जुलै १९९८ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ता.स. नाईक ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक, मुंबई/नाशिक
अधिक्षक, नाशिक मध्यवर्ती कारागृह, नाशिक.
विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
अधिक्षक, जे.जे. समूह रुग्णालय, मुंबई.
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा] मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई.
शासकीय अभियोक्ता [पब्लिक प्रॉसिक्यूटर] उच्च न्यायालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, विशेष-३ अ, गृह विभाग.
निवडनस्ती [पीआरएस-२]